**गट-अ व गट-ब मधील राजपत्रित अधिकारी यांच्या बाबतीत प्रशासकीय विभाग स्तरावर निलंबन आढावा समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१०१५/प्र.क्र.५१७/प्रशासन-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २६ जून, २०१५

वाचा :- शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.अभियो-१३१४/प्र.क्र.८६/११-अ, दिनांक ३१.१.२०१५

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम १९७९ च्या नियम ४ मधील पोटनियम ५ च्या खंड (क) च्या परंतुकानुसार शासकीय कर्मचाऱ्यांवर फौजदारी गुन्हा दाखल करण्यात आला असेल अशा प्रकरणांमध्ये व निलंबित गट-अ व गट-ब संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्याकरिता प्रशासकीय विभागाच्या स्तरावर समिती गठीत करण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दिनांक ३१.१.२०१५ मधील परिच्छेद क्र.७ मध्ये नमूद केल्यानुसार वित्त विभागाचे प्रशासकीय प्रमुख या नात्याने अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली गट-अ व गट-ब च्या अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यासाठी प्रशासकीय विभाग स्तरावर "निलंबन आढावा समिती" गठीत करण्यात येत असून सदर समितीची रचना पुढीलप्रमाणे असेल.

| | |
|---|---|
| १) अपर मुख्य सचिव (वित्त) | : अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव/सचिव (व्यय/वि.सु/ ले.व को.) | : सदस्य |
| ३) अतिरिक्त पोलीस महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग | : सदस्य |
| ४) सह सचिव/उपसचिव (गृह विभाग) | : सदस्य |
| ५) वित्त विभागातील निलंबन प्रकरणांशी संबंधित सह/उपसचिव | : सदस्य सचिव |

अ.क्र.२ व ५ येथील अधिकारी हे समितीच्यापुढे विचारार्थ असलेल्या अधिकाऱ्यांशी संबंधीत आस्थापनेचे प्रशासकीय काम पाहणारे असतील. सदर समितीने सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दिनांक ३१.१.२०१५ मध्ये नमूद कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०६२६१७१३२३३२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Suresh Sonar

Digitally signed by Sunil Suresh Sonar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9943b9c43b20ef0edc259749498600709e128347f867f9400ca5678c69418e81, cn=Sunil Suresh Sonar
Date: 2015.06.26 17:15:29 +05'30'

**( सुनील सु. सोनार )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव(व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव(वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव(लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अतिरिक्त पोलीस महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, वरळी, मुंबई
६. सह सचिव/उपसचिव (गृह विभाग), मंत्रालय, मुंबई
७. सह/उपसचिव, लेखा व कोषागारे/ स्थानिक निधी प्रशासन/विक्रीकर प्रशासन/ विमा प्रशासन/अल्पबचत/लॉटरी प्रशासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**प्रत**

१) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी संचालनालय, मुंबई.
३) संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
५) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
६) निवडनस्ती , प्रशासन-१